दहिगांव उपसा सिंचन योजना,ता. करमाळा,
जि. सोलापूर, द्वितीय सुधारित प्रशासकीय
मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र: सुप्रमा ०९२०/प्र. क्र.(२८६/२०२०)/ मोप्र १**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. २० ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ** :- १) महामंडळाचा निर्णय क्र. म.कृ.खो.वि.निर्णय क्र.२९६/१४८/(१९९६)/प्रशा-३/पुणे दि.१०/१०/१९९६
२) शासन निर्णय क्रमांक:- दहिगांव ०२०८/(१३९/०८)/मोप्र-१ दि.२७/०२/२००९
३) वित्त विभाग पत्र क्र.व्यअस-२०२१/प्र.क्र.१०१०/अर्थ-२ दिनांक २०/०८/२०२१ रोजीचे व्यय अग्रक्रम समितीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

दहिगांव उपसा सिंचन योजना, ता. करमाळा जि. सोलापूर, या योजनेचा उद्भव भीमा (उजनी) प्रकल्पाच्या जलाशयातून सोलापूर जिल्हयातील करमाळा तालुक्यातील दहिगांव या गावाजवळून आहे. सदर योजनेअंतर्गत उजनी जलाशयातून १.८१ अघफू (५१.३२ दलघमी) पाणी उपसा करुन करमाळा तालुक्यातील १०५०० हे. अवर्षण प्रवण क्षेत्रास सिंचनाचा लाभ देणे प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळांतर्गत उर्वरित महाराष्ट्र या प्रदेशामध्ये आहे.

दहिगांव उपसा सिंचन योजना, ता. करमाळा, जि.सोलापूर, या प्रकल्पास संदर्भ क्रमांक १ नुसार सन १९९५-९६ चे दरसुचीवर आधारीत रुपये ५७.६६ कोटी इतक्या रकमेस मूळ प्रशासकिय मान्यता देण्यात आली होती. तदनंतर संदर्भ क्र.२ नुसार सन २००७-०८ चे दरसुचीवर आधारीत रुपये १७८.९९ कोटी इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान केली होती.

कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांच्या कडून दिनांक ०९/०९/२०२० रोजीच्या पत्रान्वये प्राप्त सुप्रमा प्रस्ताव हा २०१८-१९ च्या दरसूचीवर आधारीत रुपये ३४२.३० कोटी किंमतीचा आहे. द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यतेच्या प्रस्तावानूसार प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.५४ येत असून आर्थिक परतावा दर १०.२३ इतका आहे. या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे

**शासन निर्णय :-**

दहिगांव उपसा सिंचन योजना, ता. करमाळा, जि. सोलापूर, या योजनेस सन २०१८-१९ च्या दरसूचीवर आधारीत रुपये ३४२.३० कोटी किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ३०८.७२ कोटी कामाप्रीत्यर्थ व रुपये ३३.५८ कोटी अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे.

१. प्रकल्पाचे काम नियोजनानुसार व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.
२. संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.
३. सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.
४. योजनेची अमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे वित्तीय मर्यादा विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

५. सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना सहमती आहे असे गृहीत धरता येणार नाही.
६. राज्यस्तरिय तांत्रिक सल्लागार समितीच्या अहवालातील मुद्यांची पुर्तता करावी.
७. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.
८. सदर सुधारित प्रशायकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकारची तपासणी त्या वेळच्या प्रचलित शासन निर्णयानूसार करण्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट “अ” मध्ये सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (संगणक संकेतांक ४७०१ एच २०-८ अंतर्गत दहिगांव उपसा सिंचन योजनाा या लेखाशिर्षाखाली खर्च टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.०८/२०२१ का.१४३४,दि.१८/०२/२०२१ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१३५/२१व्यय-१२, दि.१६/०४/२०२१ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १२/०७/२०२१ रोजी संपन्न बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२११३१२५७२८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SUDARSHAN S PAGAR
DN: CN = SUDARSHAN S PAGAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2021.10.21 13:14:35 +05'30'

**सहपत्र: परिशिष्ट "अ"**

**( सुदर्शन पगार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता,महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा ,विधान भवन, मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
८) नियोजन विभाग (कार्यासन १४३४) मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१२/अर्थ-२) मंत्रालय, मुंबई.

**परिशिष्ट"अ"**

**दहिगांव उपसा सिंचन योजना, ता. करमाळा, जि. सोलापूर.**

शासन निर्णय क्र: सुप्रमा ०९२०/प्र. क्र.(२८६/२०२०)/ मोप्र १

दिनांक:- २० ऑक्टोबर, २०२१

(किंमत रुपये कोटी)

| **उपशीर्ष** | **मंजूर प्रथम सुप्रमा नुसार तरतूद** | **मंजूर व्दितीय सुप्रमा नुसार तरतूद** | **वाढ/घट** |
|---|---|---|---|
| अ) शिर्षकामे | | | |
| ए- प्राथमिक | ०.०३ | ०.०३ | ०.०० |
| बी- भुसंपादन | ०.१९ | १.२५ | १.०६ |
| सी- कामे | ८७.०४ | १०५.९२ | १८.८८ |
| के- इमारत | ०.९६ | ०.०० | -०.९६ |
| एम- वनीकरण | ०.०१ | ०.०७ | ०.०६ |
| ओ- संकिर्ण | ०.१५ | ०.०६ | -०.०९ |
| पी- देखभाल | ०.११ | ०.०३ | -०.०८ |
| क्यु- यंत्रसामग्री | ०.२६ | ०.०० | -०.२६ |
| आर- दळणवळण | ०.१५ | ०.८३ | ०.६८ |
| एक्स- पर्यावरण | ०.०५ | ०.०० | -०.०५ |
| वाय- तूट | ०.२२ | ०.०० | -०.२२ |
| **एकूण अ** | **८९.१७** | **१०८.१९** | **१९.०२** |
| ब) कालवे व वितरीका | | | |
| ए- प्राथमिक | ०.१३ | ३.६९ | ३.५६ |
| बी- भुसंपादन | १.७२ | ४८.०४ | ४६.३२ |
| सी- कामे | ०.०० | ०.०० | -१५.८५ |
| डी- विमोचक | ०.१४ | २.३५ | २.२१ |
| इ- प्रपात | ०.१७ | २.७३ | २.५६ |
| एफ-मोरीकामे | २.१४ | ४.५६ | २.४२ |
| जी- पुल | ०.८६ | ६.५२ | ५.६६ |
| एच- अतिवाही | ०.०२ | ०.६२ | ०.६० |
| के- इमारत | ०.८२ | ०.०० | -०.८२ |
| एल i- मातीकम | १८.४६ | २४.७९ | ६.३३ |
| एल ii-अस्तरीकरण | १५.८५ | २७.२३ | ११.३८ |
| एम- वनीकरण | ०.३० | ०.२६ | -०.०४ |
| ओ- संकिर्ण | ०.०२ | ०.०७ | ०.०५ |
| पी- देखभाल | ०.०५ | ०.४७ | ०.४२ |
| क्यु- यंत्रसामग्री | ०.२६ | ०.०० | -०.२६ |
| आर- दळणवळण | ०.०९ | ०.०० | -०.०९ |

| | | | |
|---|---|---|---|
| यु- वितरिका | १२.०४ | ४८.३९ | ३६.३५ |
| व्ही- शेतचारी/CAD | १५.७५ | ३०.६८ | १४.९३ |
| एक्स- पर्यावरण | ०.०५ | ०.१३ | ०.०८ |
| वाय- तूट | ०.१० | ०.०० | -०.१० |
| एकूण **ब** | **६८.९५** | **२००.५३** | **१३१.५८** |
| **क)एकूण कामे : (अ + ब)** | **१५८.१२** | **३०८.७२** | **१५०.६०** |
| **ड) इ.टी.पी. व इतर चार्जेस** | २०.८७ | ३३.५८ | १२.७१ |
| **एकूण एकंदर क + ड** | **१७८.९९** | **३४२.३०** | **१६३.३१** |

Digitally signed by SUDARSHAN S PAGAR
DN: CN = SUDARSHAN S PAGAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2021.10.21 13:14:51 +05'30'

( सुदर्शन पगार )
शासनाचे उप सचिव